**धर्मादाय संघटनेतील धर्मादाय सह आयुक्त, गट-अ या पदावर नियमित पदोन्नती - निवडसूची सन २०२३-२४**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग,**
**शासन आदेश क्र : सीएचए-२०२३/प्र.क्र.१४२/का.१,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०००३२.
दिनांक - १२ मार्च, २०२५

**संदर्भ :-** विधि व न्याय विभाग समक्रमांकाचे शासन आदेश, दि.१६.०२.२०२४

**शासन आदेश**

संदर्भीय शासन आदेशान्वये विधि व न्याय विभागाच्या अधिनस्त धर्मादाय आयुक्त कार्यालयाच्या आस्थापनेवरील धर्मादाय उप आयुक्त, गट-अ या संवर्गातील खालील तक्त्यात नमूद अधिकाऱ्यांना धर्मादाय सह आयुक्त, गट-अ या संवर्गातील पदोन्नतीच्या कोट्यातील रिक्त पदांवर तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नती देण्यात आली होती. आता, सन २०२३-२४ च्या निवडसूचीस महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून मिळालेल्या मान्यतेस अनुसरुन, खालील तक्त्यात नमूद अधिकाऱ्यांना त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या दिनांकापासून धर्मादाय सह आयुक्त, गट-अ या संवर्गामध्ये नियमित पदोन्नती देण्यात येत आहे.

| **अ.क्र.** | **अधिकाऱ्यांचे नाव** | **नियमित पदोन्नतीचा दिनांक** |
|---|---|---|
| **(१)** | **(२)** | **(३)** |
| १ | श्री. राहूल गोपाळराव मामू | २०.०२.२०२४ |
| २ | श्रीम. सुवर्णा प्रविणकुमार खंडेलवाल-जोशी | २२.०२.२०२४ |
| ३ | श्रीम. हिरा काशिनाथ शेळके | २१.०२.२०२४ |
| ४ | श्री. विवेक रमेश सोनुने | २१.०२.२०२४ |

२. सदर नियमित पदोन्नती व नियमित पदोन्नतीचे दिनांक खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून देण्यात येत आहे:

(१) मा. सर्वोच्च न्यायालयातील विशेष अनुमती याचिका क्र. २८३०६/२०१७ मधील निर्णयास अधीन राहून सदर नियमित पदोन्नती व नियमित पदोन्नतीचे दिनांक देण्यात येत आहे.

(२) रिट पिटीशन (स्टॅम्प) क्र. १०८७६/२०२१ व रिट पिटीशन (स्टॅम्प) क्र. १०८७८/२०२१ मध्ये मा. उच्च न्यायालय, मुंबई यांनी दि. २५.०५.२०२१ रोजी दिलेल्या निर्णयानुसार सदर पदोन्नती नमूद रिट याचिकेत होणाऱ्या निर्णयाच्या अधीन राहील.

(३) धर्मादाय उप आयुक्त, गट-अ या संवर्गाच्या सेवाज्येष्ठता यादीस मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, खंडपीठ औरंगाबाद येथे दाखल मूळ अर्ज क्र.१५५/२०२४ अन्वये आव्हान देण्यात आले असून, सदर प्रकरण अद्याप प्रलंबित आहे. सदर मूळ अर्जातील मा. न्यायाधिकरणाच्या अंतिम निर्णयाच्या अधीन सदर नियमित पदोन्नती व नियमित पदोन्नतीचे दिनांक देण्यात येत आहेत.

३. उपरोक्त नियमित पदोन्नत अधिका-यांनी पदोन्नतीच्या पदावरील त्यांच्या वेतन निश्चितीचा विकल्प या आदेशाच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत द्यावा. अशा प्रकारचा विकल्प न दिल्यास वेतननिश्चिती महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ मधील ११(१)(ए) खालील तरतूदीनुसार पदोन्नतीचा दिनांक विचारात घेऊन केली जाईल.

४. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२५०३१२१२३१२९६४१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MANISHA ANIL KADAM

Digitally signed by MANISHA ANIL KADAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT, 2.5.4.20=6e49954abe1615213c9867d36416b4646311d3a20fa0e8638f40554d1f74d87b, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=46C6AAD763D6F6FE01CAEF299F7BF533D85983B1491695AAAE025643F38D12D4, cn=MANISHA ANIL KADAM
Date: 2025.03.12 12:32:57 +05'30'

**(मनिषा अ. कदम)**
**सहायक सॉलिसिटर-नि-उप सचिव,**
**महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

(१) मा. मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई,
(२) मा. राज्यमंत्री (विधि व न्याय) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
(३) धर्मादाय आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
(४) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा) मुंबई/नागपूर,
(५) उप सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
(६) सह सचिव (आस्थामं), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई,
(७) लेखासंचालक, धर्मादाय आयुक्त कार्यालय, मुंबई,
(८) संबंधित अधिकारी,
(९) निवड नस्ती/ वैयक्तिक नस्ती/गोपनीय लिपिक.